**मिशन वात्सल्य योजनेंतर्गत जिल्हास्तरीय प्रायोजकत्व आणि प्रतिपालकत्व मंजूरी समिती** Sponsorship and Foster Care Approval Committee (SFCAC ) **गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः वात्सल्य-२०२३/प्र.क्र.११०/का-८**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक- १९ जून, २०२३.

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक क्रमांकः वात्सल्य-२०२२/प्र.क्र.९१/का.-०८, दि.०३.०८.२०२३
२. शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१९/ प्र.क्र.२८/ का.०८, दि.१९.०६.२०१९.

**शासन परिपत्रक :-**

केंद्र शासन पुरस्कृत बाल संरक्षणाशी संबंधित कार्यान्वित यंत्रणेची गुणवत्ता वाढविणे आणि त्या बळकट करणे या उद्देशाने एकात्मिक बाल संरक्षण योजना ही योजना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात सन २०१२-१३ पासून महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटीमार्फत राबिण्यात येत होती. एकात्मिक बाल संरक्षण योजना या योजनेचे नाव सन २०१७-१८ पासून Child Protection Scheme (CPS) असे बदलण्यात आले. आता सन २०२२-२३ पासून सदर योजनेचा "मिशन वात्सल्य" योजनेंतर्गत समावेश करण्यात आलेला आहे. संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रक, दि.०३.०८.२०२२ अन्वये "मिशन वात्सल्य" या केंद्र पुरस्कृत योजनेच्या मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदर मार्गदर्शक सूचनांची अंमलबजावणी दि.१.०४.२०२२ पासून करण्यात आलेली आहे.

२. कौटुंबिक वातावरणात रहाण्याचा बालकांचा हक्क आणि बालकांच्या सर्वांगीण विकासाचा विचार करता संस्था बाह्य पर्याय महत्वाचे ठरतात. बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ मधील मार्गदर्शक सूचनांनुसार बालकांना संस्थेत दाखल करणे हा अंतिम पर्याय म्हणून निवडणे अपेक्षित आहे. संस्थाबाह्य पर्यायात दत्तक, प्रतिपालकत्व, प्रायोजकत्व व अनुरक्षण हे पर्याय आहेत. बालकाला दत्तक दिल्याने बालकाचे कायमस्वरूपी पुनर्वसन होते. त्यामुळे पूर्ण अनाथ बालकांना दत्तक देण्यास नेहमीच प्राधान्य दिले जाते. तथापि, दत्तक देणे शक्य नसलेल्या

बालकांना बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ च्या २ (२९) नुसार प्रतिपालकत्व (Foster Care) योजनेचा लाभ देता येते. प्रतिपालकत्व (Foster Care) ही एक व्यवस्था असून त्याद्वारे एखादे बालक सामान्यत: तात्पुरत्या तत्वावर एखादया विस्तारीत कुटुंबासोबत किंवा नातेसंबंध नसलेल्या कुंटुंबासोबत राहते.

३. तसेच, प्रायोजकत्व (Sponsorship) ही मिशन वात्सल्य योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या सेवांपैकी एक सेवा असून त्याव्दारे ज्या दुर्बल कुटुंबातील ज्या बालकांकडे लक्ष पुरविणे आवश्यक आहे अशा बालकांचे संगोपन व संरक्षण करण्यासाठी संबंधित कुटुंबाना सहाय्य आणि सक्षम करण्याचे उद्देशित केले आहे. तसेच, मिशन वात्सल्य योजनेंतर्गत  दुर्बल कुटुंबातील बालकास त्याच्या कुटुंबातच ठेवून त्याचे किंवा तिचे शिक्षण चालू ठेवणे शक्य होण्याकरिता प्रायोजकत्व सहाय्य पुरविण्यात येते. पुनर्वसनात्मक प्रायोजकत्वामध्ये संस्थेतील बालकांना किंवा प्रतिपालक संगोपनामधील बालकांना त्यांच्या स्वतःच्या किंवा नातेसंबंधातील कुटुंबांमध्ये पाठवता यावे किंवा सामील करता यावे याकरीता मुलांना प्रायोजकत्व सहाय्य पुरविले जाते. प्रायोजकत्व सहाय्य हे बाल विवाह, बाल कामगार, अपव्यापार, इत्यादींमधून सुटका केलेल्या बालकांचे पुनर्वसन करण्यासाठी देखील उपयुक्त आहे..

४. “मिशन वात्सल्य” या केंद्र पुरस्कृत योजनेच्या मार्गदर्शक सूचनांमध्ये जिल्हास्तरावर प्रायोजकत्व आणि प्रतिपालकत्व मंजूरी समिती Sponsorship and Foster Care Approval Committee (SFCAC) गठीत करण्याबाबत तरतूद नमूद आहे. त्यानुसार प्रत्येक जिल्हास्तरावर खालीलप्रमाणे प्रायोजकत्व आणि प्रतिपालकत्व मंजूरी समिती Sponsorship and Foster Care Approval Committee  (SFCAC ) चे गठन संबंधित जिल्हाधिकारी यांनी करावे.

| अ.क्र. | सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | अध्यक्ष/सदस्य बाल कल्याण समिती | सदस्य |
| ३ | विशेष दत्तक स्त्रोत संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | बालकांच्या संरक्षणाशी संबंधित क्षेत्रातील काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | जिल्हा बाल संरक्षण अधिकारी | सदस्य सचिव |
| ६ | संरक्षण अधिकारी (PO NIC) | सदस्य |
| ७ | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | सदस्य |

५. सदर समितीने शासन परिपत्रक, दि.०३.०८.२०१९ निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्रति पालकत्व (Foster Care), प्रायोजकत्व (Sponsorship) व अनुरक्षण (After Care) या संस्थेत्तर सेवांचे लाभ बालकांना देण्याच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करावी.

६. प्रायोजकत्व आणि प्रतिपालकत्व मंजूरी समिती (SFCAC) ची भुमिका व जबाबदारी खालीलप्रमाणे आहे:-

I. प्रायोजकत्व आणि प्रतिपालकत्व योजनांची प्रत्येक जिल्ह्यामध्ये अंमलबजावणी करणे व आढावा घेणे.

II. प्रायोजकत्व / प्रतिपालकत्व योजनांची गरज असलेल्या बालकांच्या प्रकरणांमध्ये आढावा घेऊन तशी शिफारस करणे व मान्यता देणे. शिफारस केलेली प्रकरणे बाल कल्याण समितीकडे आदेश निर्गमित करण्याच्या अनुषंगाने पाठविणे.

III. बाल कल्याण समितीने प्रायोजकत्व / प्रतिपालकत्वाच्या आदेशाच्या अनषंगाने काढलेल्या आदेशाबाबत सदर समिती जबाबदार असेल.

IV. सदर समितीची बैठक दर महिन्याला आयोजित करण्यात येईल. सदर समिती कालबध्द पध्दतीने काम करेल. तसेच, प्राप्त झालेल्या अर्जाच्या अनुषंगाने तीन महिन्यांच्या कालावधीमध्ये निर्णय घेईल.

V. प्रायोजकत्व/प्रतिपालकत्वाचा लाभ दिलेल्या प्रत्येक बालकाचा काळजीने सांभाळ केल्याबाबत समिती आढावा घेईल. सदर आढाव्याच्या आधारे लाभार्थी बालकाचा प्रायोजकत्वाचा कालावधी वाढविण्यात येईल.

VI. जिल्हा बाल संरक्षण कक्षाने इतर विभागाच्या समन्वयाने संबंधीत कुटूंबाच्या सशक्तीकरणाबाबत केलेल्या प्रयत्नांबाबत सदर समिती आढावा घेईल.

VII. प्रायोजकत्वाचा लाभ दिलेल्या बालकांचा आढावा घेऊन संबंधितांचे प्रायोजकत्व समाप्त करण्याच्या अनुषंगाने समिती आढावा घेईल व शिफारस करेल.

७. प्रायोजकत्व आणि प्रतिपालकत्व मंजूरी समिती (SFCAC) कुंटूबाधारीत प्रायोजकत्वाचा खालील प्रकरणी आढावा घेऊन प्रायोजकत्व सेवा समाप्त करण्याबाबत शिफारस करेल:-

I. बालकाच्या वयाची१८ वर्ष पूर्ण झाल्यानंतर.

II. कुंटूबाची आर्थिक परिस्थिती सुधारल्यास आणि संबंधीत कुंटूबाने स्वेच्छेने प्रायोजकत्वाचा लाभ घेण्यास नकार दिल्यास.

III. बालक विकलांगतेमुळे अथवा आजारी असल्यामुळे शाळेत/अंगणवाडीमध्ये जात नसल्याबाबत जिल्हा बालक संरक्षण कक्षाने प्रमाणित केल्यास तसेच, संबंधित बालक ३० दिवसापेक्षा अधिक दिवस गैरहजर राहिल्यास प्रायोजकत्व सेवेचा आढावा घेऊन सेवा स्थगित ठेवेल.

IV. बालकास बालकांची काळजी घेणाऱ्या संस्थेत दाखल केल्यास.

V. बालकास वैद्यकीय समस्या असल्यास आणि संबंधित पालक बालकाची काळजी घेण्यास असमर्थ असल्यास.

VI. दोन्ही पालक बालकाची काळजी घेण्यास अक्षम आणि अयोग्य असल्यास (सदर प्रकरणी प्रायोजकत्व सेवा नातेवाईक अथवा इतर कुंटूबाधारीत व्यवस्थेकडे सोपविण्यात येईल)

VII. ज्या प्रकरणी बालकास बालकांची काळजी घेणाऱ्या संस्थेतून मुक्त केलेले असेल आणि सदर कुंटूंब बालकासमवेत कमीतकमी ३ महिने कालावधीमध्ये एकत्र राहत असताना कुंटूंबाचे बालकासमवेत मतभेद निर्माण झाल्यास.

८. संरक्षण अधिकारी (PO NIC) हा बालकाची, कुंटूंबाची सद्यस्थिती आणि प्रायोजकत्व सेवा समाप्त करण्याबाबत शक्यता असल्यास त्याबाबतची कारणे तसेच बालकाच्या वतीने पुढील कार्यवाही करण्याबाबतचा सल्ला प्रायोजकत्व आणि प्रतिपालकत्व मंजूरी समिती (SFCAC) च्यापुढे सादर करेल.

९. प्रायोजकत्व आणि प्रतिपालकत्व मंजूरी समितीने (SFCAC) एखाद्या बालकाच्या संदर्भात प्रायोजकत्व सेवा समाप्त करण्याचा निर्णय घेतल्यास बालकाची पर्यायी काळजी घेण्याच्या आणि पुनर्वसन करण्याच्या दृष्टीने गरज असल्यास शिफारस करेल. यामध्ये बालकाच्या दृष्टीने योग्य पर्यायी स्थापनेबाबतच्या समावेश असेल. समिती आपली शिफारस बाल कल्याण समितीपुढे ठेवेल. बाल कल्याण समिती प्रायोजकत्व सेवा रद्द करण्याचा, समाप्त करण्याचा आणि बालकाचे प्रकरण बंद करण्याचा निर्णय घेईल. अशा प्रकरणी संरक्षण अधिकारी (PO NIC) हा बालकाचे योग्य पुनर्वसन करण्याबाबत विनंती करेल.

१०. सदर समितीतील सदस्यांना मानधन अथवा बैठक भत्ता / प्रवास भत्ता अथवा इतर कोणताही भत्ता अनुज्ञेय असणार नाही.

११. तसेच, यापूर्वी एकात्मिक बाल संरक्षण योजनेंतर्गत प्रतिपालकत्व, प्रायोजकत्व व अनुरक्षण या संस्थेत्तर सेवांच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय दि.१९.०६.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरावर प्रायोजकत्व आणि प्रतिपालकत्व सल्लागार समिती Sponsorship and Foster Care Advisory Committee (SFCAC) गठीत केलेल्या आहेत. सदर जिल्हास्तरीय (SFCAC) समित्या बरखास्त करण्यात याव्यात.

१२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६१९११५६०४६९३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NILESH JANARDAN PATIL

Digitally signed by NILESH JANARDAN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b7f57a5d2af23fdb37cfec3c30cfe085ddbef06ea381e7e81401a472bbb966f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7D8429F943427129A6A081EE223FEAC961CDD926C4D3542C55A470F22A7C7AE, cn=NILESH JANARDAN PATIL
Date: 2023.06.19 15:00:06 +05'30'

**(डॉ.निलेश ज. पाटील)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
७. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
९. जिल्हाधिकारी सर्व
१०. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
११. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
१२. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उपायुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१४. कार्यक्रम व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण संस्था, पुणे
१५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी सर्व
१६. निवड नस्ती, का-०८.